राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० पीआयपीमधील प्राप्त अनुदानातून महानगरपालिका क्षेत्रात १० मोबाईल मेडिकल युनिट सेवा बाह्यसेवा पुरवठादाराकडून कार्यरत करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्याकरीता प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-०५१९/प्र.क्र.२८१/आरोग्य -७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा :-**

०१. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र. जा.क्र. राआसो/MMU/प्रशासकीय मान्यता/५३३५/२०१९, दिनांक २२ एप्रिल, २०१९.
०२. प्रकल्प संचालक (EMS) राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचे पत्र दि.०३ ऑगस्ट, २०१९.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत मोबाईल मेडिकल युनिटमार्फत शहरातील झोपडपट्टी भागात व आरोग्य केंद्रांपासून दूर असलेल्या भागामध्ये फिरत्या वाहनामध्ये प्राथमिक, उपचारात्मक आणि संदर्भसेवा नियमितपणे पुरविणे व जनतेला आरोग्य विभागाची विनामुल्य सेवा मिळावी या उद्देशाने सन २०१८-१९ पासून सदर योजना कार्यान्वित झालेली आहे. वर्ष २०१९-२० मध्ये केंद्र शासनाकडील मंजुर वार्षिक कृती अंमलबजावणी आराखडयामध्ये १० मोबाईल मेडिकल युनिट महानगरपालिका क्षेत्रासाठी मंजूर झालेले आहेत. त्यानुषंगाने १० महानगरपालिका क्षेत्रात मोबाईल मेडिकल युनिट कार्यरत करण्यासाठी बाहय संस्था नेमण्याच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानांतर्गत आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये केंद्र शासनाने मंजुर केलेल्या वार्षिक कृती आराखडयात FMR Code U.२.१.१ अंतर्गत मंजुर केलेल्या अनुदानातून नाशिक, सोलापूर, ठाणे, नवी मुंबई, पुणे, पिंपरी-चिंचवड, भिवंडी-निजामपूर, वसई-विरार, मिरा-भाईंदर व उल्हासनगर अशा एकूण १० ठिकाणी मोबाईल मेडिकल युनिट सेवा बाह्यसेवा पुरवठादाराकडून कार्यान्वित करावयाची आहे. सदर मोबाईल मेडिकल युनिट सेवा

यामध्ये बाहयसेवा पुरवठादारानेच वाहने खरेदी करणे, त्यामध्ये आवश्यक बदल करणे, सोयीसुविधा पुरविणे तसेच मनुष्यबळ उपलब्ध करणे या बाबी समाविष्ट आहेत. सदर मोबाईल मेडिकल युनिटस कार्यान्वित करण्याकरीता अंदाजित रक्कम रु.१८०.०० लक्ष इतका खर्च अपेक्षित आहे. सदरची सेवा घेण्याकरीता नेमण्यात येणाऱ्या बाह्य सेवा पुरवठादाराच्याकरीता करावयाच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनाकडे सादर केलेला आहे. त्या अनुषंगाने प्रस्तावित मोबाईल मेडिकल युनिट सेवा बाहय-सेवापुरवठादाराकडून उपलब्ध करून घेण्याकरीता आवश्यक निविदा प्रक्रियेस खालील विवरणपत्रानुसार पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे:-

**विवरणपत्र**

| Sr. No. | FMR Code | Name of Head | Approved Budget in NUHM PIP 2019-20 (In Lakhs) | Procurement Proposal (In Lakhs) |
|---|---|---|---|---|
| 1 | FMR Code U.2.1.1. | Mobile Medical Units (MMU)/ Mobile | **Rs.180.00 Lakhs** Recommended for 10 new MMU for 10 Corporations namely Thane, Pune, Pimpri-Chinchwad, Navi Mumbai, Solapur, Bivandi-Nijampur, Nashik, Vasai-Virar, Mira-Bhayandar, Ulhasnagar on out sourcing basis including CAPEX and OPEX @ Rs.2 Lakhs for 9 Months. Drugs and suppliesto be provided by the Govt. State to ensure that MMUs to be deployed in localities where slum populations lives and where there is no space for creating infrastructure. State to share the progress of MMUs." | Rs.180.00 Lakhs<br><br>Establishment for 10 MMUs as per approved PIP by Outsourcing |

**अटी :-**

१) मोबाईल मेडिकल युनिटची सेवा बाह्यसेवा पुरवठादाराकडून प्रस्तावित आहे.ज्यामध्ये मेडिकल युनिटसाठी लागणारे वाहने, यंत्रसामुग्री, कर्मचारी वर्ग, इंधन खर्च व इतर खर्च स्वत: बाह्य यंत्रणेने करणे व काम सुरु झाल्यानंतर प्रति महिना OPEX च्या बिलाची रक्कम सदर बाह्य यंत्रणेस अदा करण्यात यावी.

२) सदर सेवेबाबत आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

३) सदरहू बाबीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबीचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा

रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित बाबींचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे निविदा प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

६) सदर सेवेबाबत पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असल्याची खात्री करण्यात यावी.

७) सदरहू बाबीसाठी होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्य आरोग्य सोसायटीकडून NUHM अंतर्गत सन २०१९-२० साठी उपलब्ध करुन दिलेल्या लेखाशिर्ष FMR Code U.२.१.१ अंतर्गत Mobile Medical Units (MMU)/ Mobile या घटकाखाली मंजुर करण्यात आलेल्या रु.१८०.०० लक्ष इतक्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची निविदा प्रक्रिया प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण निविदा प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित

करण्यात यावेत.

२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची तसेच यासंदर्भात काही सेवा घ्यावयाची असल्यास ती नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, मुंबई व राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201911271233156717 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2019.11.28 14:59:33 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
३) सहसंचालक (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५) वरिष्ठ सल्लागार, पीपीपी, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)